प्रतिनियुक्तीने नियुक्ती-
मा. राज्यपालांचे सचिव कार्यालय,
राजभवन, मुंबई.
श्रीमती चा.बा.पाटील, उच्चश्रेणी लघुलेखक

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५२१/प्र.क्र.११७/१४-अ
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०१ ऑक्टोबर, २०२१

## शासन आदेश

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत करावयाची कार्यपध्दती सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.१२०/१४, दिनांक ३१.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मा. राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील वरीष्ठ स्वीय सहाय्यक, लघुलेखक (उच्चश्रेणी) व लघुटंकलेखक ही रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील वरीष्ठ स्वीय सहाय्यक, उच्चश्रेणी लघुलेखक व लघुटंकलेखक या संवार्गातील कर्मचाऱ्यांकडून या विभागाच्या दिनांक २७-०८-२०२१ च्या पत्रान्वये इच्छुकता मागविण्यात आली होती. सदरहू इच्छुकतेस अनुसरुन प्राप्त प्रस्तावानुसार खालील कर्मचाऱ्याची सेवा प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव, पदनाम व विभाग | प्रतिनियुक्तीचे ठिकाण | प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील पद |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती चा.बा.पाटील, उच्चश्रेणी लघुलेखक गृह विभाग | मा.राज्यपालांचे सचिव कार्यालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई-४०००३५ | लघुलेखक (उच्चश्रेणी) |

२. उपरोक्त नमूद कर्मचाऱ्याची सेवा त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या कार्यालय व पदनाम या पदावर **प्रथमत: दोन वर्षाच्या** कालावधीसाठी खालील अटी व शर्तीनुसार प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे..

(अ) ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्याला मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ व १६-०२-२०१८ मधील तरतुदी विचारात घेऊन, गृह विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती बाबत सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन २०-अ यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

४. श्रीमती चा.बा.पाटील, उच्चश्रेणी लघुलेखक, गृह विभाग यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी गृह विभागामार्फत हाताळण्यात येतील. गृह विभागाने प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होण्यासाठी श्रीमती चा.बा.पाटील, उच्चश्रेणी लघुलेखक यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. त्यांना **प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी कार्यमुक्त केल्याचा दिनांक व त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होण्यांचा दिनांक स्पष्टपणे आदेशात नमूद करावा, तसेच सदर दिनांकास श्रीमती पाटील यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवा मूळ विभागात आपोआप प्रत्यावर्तित होतील असेही प्रतिनियुक्तीच्या आदेशात स्पष्टपणे नमूद करावे.**

५. प्रतिनियुक्ती ही संबंधित कर्मचाऱ्याची व प्रतिनियुक्तीवरील कार्यालयाची तात्पुरती व्यवस्था असून संबंधित कर्मचाऱ्याची प्रतिनियुक्तीने नेमणूक करण्यात आल्यामुळे तो कार्यरत असलेल्या विभागात त्या कर्मचाऱ्याची कमतरता रिक्त पदांअभावी नेहमी जाणवते. प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील कार्यालयाने सदरहू कर्मचाऱ्याचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होताच, त्याची सेवा त्याच्या मूळ विभागास प्रत्यावर्तित करावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००११८२७१४१३०७ असा आहे. सदरहू आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.10.01 18:28:17 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती चा.बा.पाटील, उच्चश्रेणी लघुलेखक गृह विभाग (विभागामार्फत)

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, गृह विभाग/सामान्य प्रशासन विभाग/का.२०-अ, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) मा.राज्यपालांचे सचिव कार्यालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई-४०००३५

४) सह/उप सचिव (आस्थापना), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या विभागातील संबंधित उच्चश्रेणी लघुलेखक यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देताना परिच्छेद ३ मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करुन काढण्यात आलेल्या आदेशाची प्रत या कार्यासनाकडे तात्काळ पाठविण्यात यावी.

५) सह/उप सचिव (२०-अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

त्यांना विनंती करण्यात येते की, श्रीमती चा.बा.पाटील, उच्चश्रेणी लघुलेखक यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने त्वरेने उपलब्ध होतील याबाबत त्यांनी गृह विभाग (आस्था-२) या कार्यासनाकडे पाठपुरावा करावा.

६) सा.प्र.वि./का.क्र.१४-अ (संग्रहार्थ/निवड नस्ती).